**राष्ट्रीय सहकारी विकास निगम नवी दिल्ली यांना सन २००९-२०१० पर्यतच्या कर्जाची परतफेड करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्र.रासविनि-०७१०/प्र.क्र.१६६/१/२१-स
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १६ सप्टेंबर, २०१०.

**वाचा :-** १) रासविनि, नवी दिल्ली यांचे क्र.एनसीडीसी ए ॲन्ड सी/नऊ/(२)/आरईपी/०९/१५४, दि. १ जुलै,२०१० रोजीचे पत्र
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-१००६/प्रक्र. १३१/कोषा प्रशासन-५, दि.१५.५.२००७

**शासन निर्णय :-**

राज्यातील सहकार विकासाकरिता राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी विभागांतर्गत राबविण्यात येणा-या वेगवेगळया योजनासाठी राज्य शासनास कर्ज मंजूर केले होते सदरचे कर्ज व त्यावरील व्याज याची आर्थिक वर्ष २००९-२०१० पर्यत परतफेडीच्या हप्त्यापोटी देय रक्कमा खाली दर्शविल्याप्रमाणे आहेत :-

| | | | |
|---|---|---|---|
| मुद्दल | रुपये | १०९,८२,०४,१००/- | (रु.एकशे नऊ कोटी ब्याऐंशी लाख चार हजार शंभर फक्त) |
| व्याज | रुपये | ५५,८६,२०,६४३/- | (रु.पंचावन्न कोटी शहाऐंशी लाख वीस हजार सहाशे त्रेचाळीस फक्त) |
| एकूण | रुपये | १६५,६८,२४,७४३/- | (रु. एकशे पासष्ट कोटी अडुसष्ट लाख चोवीस हजार सातशे त्रेचाळीस फक्त) |

**२.** राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत राज्य शासनास मंजूर केलेल्या एकूण कर्जापैकी वरीलप्रमाणे चालू वर्षी (२०१०-११) देय असलेल्या कर्ज व त्यावरील व्याजाच्या रकमांपैकी कर्ज रु. १०९,८२,०४,१००/- (रु.एकशे नऊ कोटी ब्याऐंशी लाख चार हजार शंभर फक्त) आणि व्याज रु. ५०,००,००,०००/- (रु.पन्नास कोटी फक्त) असे एकूण रु. १५९,८२,०४,१००/- (रु. एकशे एकोणसाठ कोटी ब्याऐंशी लाख चार हजार शंभर फक्त) इतकी रक्कम राष्ट्रीय सहकार विकास निगमाला परतफेड करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

**३.** सदर खर्च चालू आर्थिक वर्षात ( २०१०-२०११) खालील लेखाशीर्षांतर्गत करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**कर्ज रु.** १०९,८२,०४,१००/- (रु.एकशे नऊ कोटी ब्याऐंशी लाख चार हजार शंभर फक्त)
अनुक्रमांक व्ही-४
मुख्यलेखाशीर्ष
६००३ राज्य शासनाचे देशांतर्गत ऋण

(१०८)राष्ट्रीय सहकार विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे
(००) (०१) राष्ट्रीय सहकार विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे
( ६००३ ०२४ २)
भारित -५६ कर्जाची परतफेड

**व्याज** रुपये ५०,००,००,०००/- (रु.पन्नास कोटी फक्त)
अनुक्रमांक व्ही-१
मुख्यलेखाशीर्ष
२०४९ व्याज प्रदाने
०१ देशातंर्गत ऋणावरील व्याज
२०० देशातंर्गत इतर ऋणावरील व्याज
(०२ )(०१)राष्ट्रीय सहकार विकास महामंडळाकडून मिळणा-या कर्जावरील व्याज
(२०४९ १०४ ३),४५ व्याज

**३.** राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी, दिल्ली यांना मंजूर केलेली उपरोल्लिखित रक्कम अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई यांचेकडून आहरण करुन निगमाला त्याचे वितरण करण्यासाठी श्री.य.गं.पाटील, कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय , मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच श्री. ना. ल. तडोसे, सह सचिव (पणन), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचा "धनादेश" राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना द्यावयाचा असल्याने सदर देय रकमेचा धनादेश National Co-operative Development Corporation यांचे नावे देण्यात यावा. राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी सदर "धनादेश" प्राप्त झाल्याची पोच महाराष्ट्र शासनास तार /फॅक्सव्दारा द्यावी व मुद्रांकित पावती पाठवावी.

**४.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.४९५/१०/व्यय-२, दि.१३/९/२०१० अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय,महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९१६२३४१४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-
( श्रीकांत चं. आंडगे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-महाराष्ट्र राज्य -१/२ मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल ( लेखा परीक्षा )-महाराष्ट्र राज्य -१/२ मुंबई/नागपूर,
३. प्रधान सचिव (सहकार व पणन) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

४. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
५. उपसचिव (साखर/वस्त्रोद्योग/सुतगिरण्या/पणन/वि.का.अ.(पतसंस्था) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
६. कार्यासन अधिकारी,(रोखशाखा),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
७. अवर सचिव (२-स,९-स,२४-स, टेक्स-अ/ब, टेक्स-२), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
८. कक्ष अधिकारी ( ३-स/१६-स /:१७-स ), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
९. कक्ष अधिकारी,( व्यय-२/अर्थोपाय),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. श्री.र.रा.नार्वेकर,कक्ष अधिकारी,व वेब को.ऑर्डिनेटर,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
११. सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे
१२. पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे
१३. साखर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे
१४. संचालक,वस्त्रोद्योग,महाराष्ट्र राज्य,नागपूर
१५. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई
१७. सहसंचालक,लेखा व कोषागारे (संगणक शाखा)
नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला,मादाम कामा रोड,मंत्रालयासमोर,मुंबइ्र-३२
१८. संचालक,राष्ट्रीय सहकार विकास निगम,४ सिरी इन्स्टिटयूशनल एरिया,हौजखास,नवी दिल्ली ११०००१
१९. प्रादेशिक उपसंचालक,राष्ट्रीय सहकारी विकास निगम,५,बी.जे.रोड,पुणे
२०. निवड नस्ती.

.................